शिवछत्रपती क्रीडापीठ/क्रीडा संकुल,म्हाळुंगे-बालेवाडी मधील विविध क्रीडा सुविधांचे नुतनीकरण/अद्ययावतीकरण इत्यादी कामाच्या रु.४०३१.५९ लक्ष किमतीच्या अंदाजपत्रकास प्रशासकीय मान्यता देणेबाबत.

**महाराष्ट्र शासन**
**शालेय शिक्षण व क्रीडा विभाग**
**शासन निर्णय क्रमांकः क्रीडायो २४२३/प्र.क्र. १६९ /क्रीयुसे-१,**
मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरु चौक,
मंत्रालय विस्तार, मुंबई-४०० ०३२.
दिनांक : २०/०३/२०२५

**वाचा :-**

१) आयुक्त, क्रीडा व युवक सेवा, पुणे यांचे पत्र, दि.२३.०१.२०२५.
२) शासन परिपत्रक, नियोजन विभाग, क्र.ससमा २०२३/प्र.क्र.१०/२०२३/का-१४६१, दि.२०.०३.२०२४.
३) मा. मुख्य सचिव यांच्या अध्यक्षतेखालील उच्चाधिकार सचिव समितीच्या दि.०७.०३.२०२५ च्या बैठकीचे इतिवृत्त.

**प्रस्तावना :-**

शिवछत्रपती क्रीडापीठ/ क्रीडा संकुल, म्हाळुंगे -बालेवाडी मधील विविध क्रीडा सुविधाच्या इमारतीची दुरुस्ती, नुतनीकरण व अद्ययावतीकरण, विद्युतीकरण, वातानुकूलन यंत्रणेचे नुतनीकरण इ. कामे करण्यासाठी क्रीडा व युवक सेवा संचालनालयाने रु.४०४७.८८ लक्ष इतक्या रकमेचा प्रस्ताव सादर केला आहे.

२. शिवछत्रपती क्रीडापीठ/ क्रीडा संकुल, म्हाळुंगे -बालेवाडी मधील क्रीडा सुविधांच्या नुतनीकरण/अद्ययावतीकरणाच्या कामांच्या एकूण रु. ४०४७.८८ लक्षच्या अंदाजपत्रकास मा. मुख्य सचिव यांच्या अध्यक्षतेखालील उच्चाधिकार सचिव समितीच्या दि.०७.०३.२०२५ च्या बैठकीत मान्यता प्राप्त झाली आहे. त्यानुसार शिवछत्रपती क्रीडापीठ/ क्रीडा संकुल, म्हाळुंगे -बालेवाडी मधील खालील कामे करण्यासाठी अंदाजपत्रक व आराखडयास प्रशासकीय मान्यता देण्याची बाब शासनाच्या विचाराधिन होती.

**शासन निर्णय:-**

शिवछत्रपती क्रीडापीठ/ क्रीडा संकुल, म्हाळुंगे -बालेवाडी मधील विविध क्रीडा सुविधाच्या इमारतीची दुरुस्ती, नुतनीकरण व अद्ययावतीकरण, विद्युतीकरण, वातानुकूलन यंत्रणेचे नुतनीकरण इ. खालील कामे करण्यासाठी रु.४०३१.५९ लक्ष किमतीच्या अंदाजपत्रकास प्रशासकीय मान्यतेसह वित्तीय मान्यता देण्यात येत आहे.

| अ.क्र. | कामाचे स्वरूप | अंतर्भूत बाबी | अंदाजपत्रकीय रक्कम (लाखात) |
|---|---|---|---|
| १ | वेटलिफ्टींग हॉल, जिम्नॅस्टिक हॉल, बॉक्सींग हॉल यांची दुरूस्ती व नुतनीकरण. | वेटलिफ्टींग हॉल | ७७.८७ |
| | | जिम्नॅस्टिक हॉल | १०४.८६ |
| | | बॉक्सींग हॉल | ५६.२८ |
| | | बॅडमिंटन हॉल | २०९.१६ |

| | | | |
|---|---|---|---|
| २ | सिथेटिक ॲथलेटिक्स ट्रॅकचे नुतनीकरण | आंतराष्ट्रीय दजोचे ॲथलेटिक्स ट्रॅक | १७८२.०० |
| ३ | बिल्डीग "ए", बिल्डीग "बी", बिल्डींग "सी", बिल्डींग "ड १ व डी-२" वसतीगृह इमारतीचे नुतनीकरण | दुरुस्ती, नुतनीकरण व इलेक्ट्रीकल्स | ३०९.८३ |
| ४ | फिटनेस सेंटरची सिव्हील, इलेक्ट्रीकल्स व इतर कामे. | इलेक्ट्रीकल, वातानुकूलन यत्राणा, फायर अलार्म, सी.सी.सी.टी.व्ही, म्युझिक सिस्टीम | २२७.१२ |
| ५ | संकुलातील विविध क्रीडा सुविधांचे विद्युतीकरणाची कामे, तसेच वातानुकूलन यंत्रणा अद्ययावत करणे. | बॅडमिंटन, जिम्नॅस्टिक, बॉक्सिंग, वेटलिफ्टिंग, टेबल टेनिस इ. ठिकाणचे एल.ई.डी. इलेक्ट्रीफिकेशन व. | ५०२.९९ |
| | | वातानुकलण यंत्रणेची दुरूस्ती | ४२१.०५ |
| ६ | शिवछत्रपती क्रीडा संकुल, पुणे येथील ए.बी.डी-२, वसतीगृहामधील व क्रीडा प्रबोधिनी भोजनगृहामधील सुविधेमध्ये सुधारणा करणेबाबत. | होस्टेल ए, बी, डी-२ व क्रीडा प्रबोधिनी भोजनगृहाचे नुतनीकरण (स्थापत्यविषक कामे) | ३४०.४२ |
| | | एकूण | ४०३१.५९ |

२. उपरोक्त खर्च "मागणी क्र.ई-३, मुख्य लेखाशिर्ष २२०४-क्रीडा व युवक सेवा, १०४, क्रीडा व खेळ, (१६) (०१) क्रीडा संकुलांची स्थापना, ३१, सहायक अनुदान (वेतनेतर),संगणक क्र.२२०४ १७०२," या लेखाशिर्षाखाली खर्ची टाकण्यात येईल. या संदर्भात निधी वितरणाची कार्यवाही स्वतंत्रपणे करण्यात येईल.

३. हा शासन निर्णय, वित्त विभाग क्र. विअप्र-२०१३/प्र.क्र.३०/२०१३/विनियम भाग-२, दिनांक २०/०९/२०१९ चे वित्तीय अधिकार नियम पुस्तिका १९७८ भाग पहिला उपविभाग-पाच महाराष्ट्र सार्वजनिक बांधकाम नियम पुस्तिकेतील अ.क्र.३, परिच्छेद क्रमांक १३४ (३) नुसार प्रशासकीय विभागास प्रदान करण्यात आलेल्या वित्तीय अधिकारास अनुसरुन निर्गमित करण्यात येत आहे.

४. उद्योग, ऊर्जा व कामगार विभागाचा शासन निर्णय दि.०१.१२.२०१६ अन्वये खरेदी धोरण निश्चित करण्यात आले असून त्यामधील तरतुदींस खरेदीसंदर्भातील कार्यवाही करणे आवश्यक राहील.

५. सदरचा शासननिर्णय संदर्भ क्र.२ येथील नियोजन विभागाच्या परिपत्रकातील तरतुदीप्रमाणे मा. मुख्य सचिव यांच्या अध्यक्षतेखालील उच्चाधिकार सचिव समितीच्या दि.०७.०३.२०२५ च्या बैठकीत मिळालेल्या मान्यतेनुसार निर्गमित करण्यात येत आहे.

६. निविदे अगोदर उक्त ६ कामांतील बाबींचे दर, परिमाणे व विनिर्देशाबाबत खात्री करणे बंधनकारक राहील. संदर्भ क्र.३ येथील बैठकीच्या इतिवृत्तातील सूचनांचे पालन करणे आवश्यक राहील.

७. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०२५०३२०१९५८४२१२२१ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

RANSING ANANDRAO DERE

Digitally signed by RANSING ANANDRAO DERE
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=SCHOOL EDUCATION AND SPORTS DEPARTMENT, 2.5.4.20=9651a3c25d5e1f106e47059f72760ff520f9b00f67c3e9186e40ed4bd4fbaee6, postalCode=400032, st=Maharashtra, serialNumber=41EC78BC14804BABDC24C7FD31BA9FBF63804F499D4335774E27423E40136397, cn=RANSING ANANDRAO DERE
Date: 2025.03.20 20:00:50 +05'30'

**(रणसिंग डेरे)**
**कार्यासन अधिकारी, महाराष्ट्र शासन**

**प्रत,**

१. मा.राज्यपालांचे सचिव,
२. मा.मुख्यमंत्री यांचे प्रधान सचिव,
३. मा.उपमुख्यमंत्री (नगर विकास) यांचे प्रधान सचिव,
४. मा.उपमुख्यमंत्री (वित्त व नियोजन) यांचे प्रधान सचिव,
५. मा.सभापती, महाराष्ट्र विधानपरिषद, महाराष्ट्र विधानमंडळ सचिवालय, मुंबई यांचे खाजगी सचिव,
६. मा.अध्यक्ष, महाराष्ट्र विधानसभा, महाराष्ट्र विधानमंडळ सचिवालय, मुंबई यांचे खाजगी सचिव,
७. मा.उपसभापती, महाराष्ट्र विधानपरिषद, महाराष्ट्र विधानमंडळ सचिवालय, मुंबई
८. मा.उपाध्यक्ष, महाराष्ट्र विधानसभा, महाराष्ट्र विधानमंडळ सचिवालय, मुंबई
९. मा.विरोधी पक्षनेता,विधानसभा / विधानपरिषद, यांचे स्वीय सहायक, मुंबई.
१०. मा.मंत्री (क्रीडा व युवक कल्याण), यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई.
११. सर्व मा. विधानपरिषद/ विधानसभा सदस्य, महाराष्ट्र विधानमंडळ, मुंबई
१२. अपर मुख्य सचिव, क्रीडा विभाग, यांचे स्वीय सहायक.
१३. आयुक्त, क्रीडा व युवक सेवा, महाराष्ट्र राज्य, पुणे.
१४. महालेखापाल (लेखा अनुज्ञेयता), महाराष्ट्र-१ - मुंबई/महाराष्ट्र-२ नागपूर.
१५. महालेखापाल (लेखा), महाराष्ट्र-१ - मुंबई/महाराष्ट्र-२ नागपूर.
१६. उपसंचालक, क्रीडा व युवक सेवा, शिवछत्रपती क्रीडा संकुल, म्हाळुंगे-बालेवाडी, पुणे.
१७. जिल्हा कोषागार अधिकारी, पुणे (संचालनालयाद्वारे)
१८. लेखाधिकारी, क्रीडा व युवक सेवा संचालनालय, महाराष्ट्र राज्य, पुणे (संचालनालयाद्वारे)
१९. कार्यासन अर्थसंकल्प, शालेय शिक्षण व क्रीडा विभाग, मंत्रालय, मुंबई,
२०. निवड नस्ती (क्रीयुसे-१).